

**राज्यातील पर्यटन स्थळांची निवड व विकास — लोणार हे पर्यटन स्थळाचा "अ" श्रेणीत समावेश करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग.
शासन निर्णय क्रमांक- एमटीसी -१०९६/प्र.क्र.५२३/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक - १५ फेब्रुवारी, २००१.

**वाचा:-** १) शासन निर्णय, गृह विभाग, समक्रमांक, दिनांक ८.११.१९९६.

२)महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. -मपविम/ विकास/ लो.वि./९७, दिनांक १२.१०.१९९७.

**शासन निर्णय:-** राज्य शासनाने पर्यटनाचा विकास करण्यासाठी एकूण ३६ स्थळांची "ब" श्रेणीमध्ये वर नमूद केलेल्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निवड केली आहे. लोणार, जि.बुलढाणा या स्थळाला विशेष असे वैशिष्ट्ये, तसेच आंतरराष्ट्रीय महत्त्व असून हे जगातील तिस-या क्रमांकाचे विवर आहे. तसेच लोणार येथील जगप्रसिध्द खा-या पाण्याच्या सरोवरामुळे पर्यटनाला खूपच वाव आहे, हे पाहता बुलढाणा जिल्ह्यातील "लोणार" या पर्यटन स्थळाचा "अ" श्रेणीमध्ये समावेश करुन आता गृह विभाग, शासन निर्णय, दिनांक ८ नोव्हेंबर, १९९६ मध्ये विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार विकास करण्यास शासन मान्यता देत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वा. म. तुरुकमाने )
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
अपर मुख्य सचिव , नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, ग्राम विकास विभाग व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
सर्व मंत्रालयीन विभाग.
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
निवडनस्ती, कार्यासन-पर्यटन.